**संदेशक पदाचे सुधारीत सेवाप्रवेश नियम**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र : सेप्रनि-१२११/(३७१/११)आ(तांत्रिक)**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :१५/१२/२०११**

वाचा : शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.बीसीएस १३५८-(एक), दि.१०.१२.१९५८

**प्रस्तावना :-** संदेशक या पदांचे सेवाप्रवेश नियम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भांकित शासन निर्णयाद्वारे विहित करण्यात आले आहेत. तत्कालीन सार्वजनिक बांधकाम विभाग व पाटबंधारे विभाग एकत्र असल्यामुळे सदर सेवाप्रवेश नियम अदयापही जलसंपदा विभागातील संदेशक पदावरील कर्मचाऱ्यांच्या सेवाभरतीकरिता वापरण्यात येत आहेत. तथापि सदर सेवाप्रवेश नियमात नमूद केलेली शैक्षणिक अर्हता टेलिग्राफिक अभ्यासक्रम हा अभ्यासक्रम कालबाहय झालेला असल्याने तसेच दूरसंदेशविषयक तांत्रिक ज्ञानामधे झालेल्या सुधारणा विचारात घेता सेवाप्रवेश नियमात सुधारणा करण्याची मागणी क्षेत्रीय अधिकाऱ्यांकडून करण्यात येत होती. त्या अनुषंगाने जलसंपदा विभागांतर्गत कर्मचाऱ्यासाठी संदेशक पदाचे सुधारित सेवाप्रवेश नियम खालीलप्रमाणे विहित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :**

जलसंपदा विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील संदेशक पदाचे सुधारित सेवाप्रवेश नियम खाली विहित केल्याप्रमाणे राहतील.

१. संदेशक पदावर खालीलप्रमाणे अर्हता धारण करणा-या उमेदवारामधून नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात येईल.

(एक) ज्यांचे वय ३३ वर्षापेक्षा जास्त नाही. तसेच ,

(दोन) ज्यांनी कला/ विज्ञान/वाणिज्य शाखेतील पदवी धारण केली आहे.

२. संदेशक पदावर नियुक्त केलेल्या व्यक्तीने महाराष्ट्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेल्या तरतुदीनुसार संगणक वापरासंबंधीचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

३. संदेशक पदावर सरळ सेवेने नियुक्त झालेल्या व्यक्तीस जर ती अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा उत्तीर्ण होण्यापासुन सूट मिळाली नसेल तर त्याला/तिला हिंदी व मराठी भाषा परीक्षा, त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

४. संदेशक पदावर नियुक्त केलेली व्यक्ती या विभागाच्या परिमंडळांतर्गत कोणत्याही कार्यालयात बदलीस पात्र राहील.

हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असुन त्याचा संगणक संकेतांक २०१११२१५१०५४४०००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

**( द.अ.शिंदे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति :
१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्र्यांचे उप सचिव
४. मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.मं. वगळून) यांचे खाजगी सचिव
५. मा. मंत्री, जलसंपदा (म.कृ.खो.वि.मं.) यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्यमंत्री, जलसंपदा, वित्त व नियोजन यांचे खाजगी सचिव
७. प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.प्रधान सचिव ( जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.जलसंपदा विभागातील सर्व कार्यकारी संचालक/मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता
११. जलसंपदा विभाग संगणक कक्ष ( महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्दीकरिता)
१२. आस्था (तांत्रिक) संग्रहार्थ.